२०११०११४१५३०४१००१



**पिंपरी-चिंचवड महानगरपालिका**
**महानगरपालिका आस्थापनेवरील पदांचे वेतनश्रेणीबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीसीसी ३००७/२३२७/प्र.क्र.२८१/०८/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- १५ जुलै,२००८**

**वाचा :-** (१) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३अ/कावि/१२६८/२००७ दिनांक २७/११/२००७ व त्यासोबतचा मनपा महासभा ठराव क्र.१५९, दिनांक २२/१०/२००७ व महानगरपालिका वेतन त्रुटी समितीचा अहवाल दि.४/८/२००७

(२) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३अ/कावि/११५/२००८ दिनांक ३१/१/२००८ व त्यासोबतचे आस्थापना खर्चाचे विवरणपत्र आणि ठाणे महानगरपालिका व नाशिक महानगरपालिका यांचे वेतनश्रेणी विषयक विवरणपत्र

**प्रस्तावना :--**

पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कर्मचा-यांचे वेतनश्रेणीतील त्रुटी दूर करण्यासाठी या महानगरपालिकेतील वरिष्ठ अधिकारी व कर्मचारी महासंघाचे प्रतिनिधी यांची वेतन त्रुटी समिती नियुक्त करण्यात आली होती. या समितीने दि.४/८/२००७ रोजी महानगरपालिका प्रशासनास सादर केलेल्या अहवालानुसार काही पदांबाबत पुर्नसुधारित वेतनश्रेणी लागू करणेची शिफारस केली आहे. या अहवालानुसार वेतनश्रेणी सुधारित करण्यासाठी महापालिका महासभा ठराव क्र.१५९, दिनांक २२/१०/२००७ अन्वये महासभेने मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये महानगरपालिका आस्थापनेवरील काही पदांचे वेतनश्रेण्या सुधारित करण्याचा प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे. सदर प्रस्ताव व त्यासोबतचा वेतनत्रुटी समितीचा अहवाल, आस्थापना खर्च, सेवाप्रवेश नियमाची प्रत तसेच समकक्ष वर्गातील ठाणे महानगरपालिका आणि नाशिक महानगरपालिका मधील समकक्ष पदांच्या वेतनश्रेण्यांचा तपशिल इ.बाबी विचारात घेवून आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावातील पदांचे वेतनश्रेण्या सुधारित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील वर्ग-४ मधील पर्यवेक्षीय पदे व त्याच वर्गातील कनिष्ठ पदे यांची वेतनश्रेणी समान असल्याने ही त्रुटी दूर करण्यासाठीचा वेतनत्रुटी समितीचा अहवाल, महानगरपालिका ठराव, आस्थापना खर्च, पदसोपान परंपरेतील (हायरारकी) वर्ग-४ ची पर्यवेक्षीय पदे आणि प्रत्यक्ष त्यांच्या खालील पदे यांचे वेतनातील त्रुटी दूर करण्याची गरज पाहता, ठाणे व नाशिक या समकक्ष महानगरपालिकेतील संबंधित पदांना

असलेली वेतनश्रेणी विचारात घेवून आयुक्तांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील वर्ग-४ मधील पर्यवेक्षीय पदांना (उदा :- नळमुकादम, मुकादम, मलेरिया सुपरवायझर, नाईक, सुरक्षा सुपरवायझर इत्यादी) रु.३०५०--४५९० ऐवजी रु.३२००-४९०० ही वेतनश्रेणी लागू करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी या आदेशानुषंगिक सर्व संविधानिक बाबींची पूर्तता करुन शासनास अहवाल पाठवावा.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,**

**( सुनील कोठेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मंबई ४०० ०३२
(२) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे,
(३) सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(४) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई